शासकीय परिचर्या महाविद्यालय (बी.एस्सी.), विष्णुपूरी, नांदेड या संस्थेकरिता सुरक्षारक्षकांची पदे महाराष्ट्र राज्य माजी सैनिक महामंडळ मर्या. (मेस्को) संस्थेकडून भरण्यास मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०२४-प्र.क्र. ४५/२४/परिचर्या

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, लोकमान्य टिळक मार्ग
नविन मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: ०६ ऑगस्ट, २०२४

**वाचा :-**

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांकः एसजीए-१५०६/प्र.क्र.९२/काम-५, दिनांक ०८.११.२००६.

२) शासन अधिसूचना, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांकः एसजीए-२०१४/प्र.क्र.३००(२)/कामगार-५, दिनांक ३०.०७.२०१४.

३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दि. १७.०४.२०१५.

४) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक: एमईडी-२०२०/प्र.क्र.२०३/२०/शिक्षण, दिनांक १६.०३.२०२१.

५) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक: पदनि-२०२१/प्र.क्र.६९/२०२१/परिचर्या, दिनांक १६.११.२०२१.

६) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष यांचे पत्र क्र-सवैशिवसं/शावैमवरुनां/सुरक्षारक्षक/फ/९४८३/२०२४, दिनांक १५.०५.२०२४.

**प्रस्तावना :-**

विभागाच्या संदर्भ क्र. ४ वरील दिनांक १६.०३.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये डॉ.शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नांदेड येथे ५० विद्यार्थी क्षमतेचे शासकीय परिचर्या (बी.एस्सी.) महाविद्यालय स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. उक्त परिचर्या महाविद्यालयात सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षात प्रथम वर्ष बी.एस्सी., नर्सिंग अभ्यासक्रमाकरिता ५० विद्यार्थी प्रवेशित झाले आहेत. सदर विद्यार्थ्यांना डॉ.शं.च.शा.वै.म.व.रु., नांदेड येथील प्रशासकीय इमारतीच्या दुसऱ्या मजल्यावर वसतिगृहाची सोय करण्यात आली आहे. सदर मजल्याचे दोन भागात विभागणी करण्यात आली असून त्यामध्ये एका बाजूस मुलांसाठी व दुसऱ्या बाजूस मुलींसाठी वेगळ्या खोल्यांची व्यवस्था करण्यात आली आहे. मुलींच्या सुरक्षेकरिता महाराष्ट्र राज्य माजी सैनिक महामंडळ (मेस्को) यांच्याकडून प्रथम वर्षी दि.०२.०४.२०२३ ते दि.३१.०३.२०२४ या कालावधीकरीता ३ महिला सुरक्षारक्षक तैनात करण्यात आले होते. सदर कालावधी संपुष्टात येऊन महाराष्ट्र राज्य माजी सैनिक महामंडळ (मेस्को) यांच्याकडून ३ महिला सुरक्षारक्षकांची सेवा ६ महिन्यांच्या कालावधीकरीता घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

नांदेड येथील परिचर्या महाविद्यालयातील ५० विद्यार्थ्यांना डॉ.शं.च.शा.वै.म.व.रु., नांदेड येथील प्रशासकीय इमारतीच्या दुसऱ्या मजल्यावर वसतिगृहाची सोय करुन दिली आहे. सदर महाविद्यालयातील विद्यार्थीनींच्या सुरक्षेकरिता ३ महिला सुरक्षारक्षक महाराष्ट्र राज्य माजी सैनिक महामंडळ (मेस्को) या संस्थेकडून उपलब्ध करुन घेण्यास व त्याकरीता दि.०२.०४.२०२४ पासून सहा महिन्यांसाठी रु. ५,४२,७००/-

(अक्षरी रुपये पाच लाख बेचाळीस हजार सातशे फक्त) (सर्व कररासहित) एवढ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियम भाग पहिला, उप विभाग -४, अ.क्र. ११ अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**३. सदर बाबींसाठी येणारा खर्च डॉ.शंकरराव चव्हाण शासकीय परिचर्या महाविद्यालय, नांदेड (लेखाशिर्ष २२१० एच ४५४) या संस्थेच्या (१०) कंत्राटी सेवा या उद्दिष्टांतर्गत चालू वित्तीय वर्षात अर्थसंकल्पीत निधीमधून भागविण्यात यावा.**

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०६१०४५१६१३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VAISHALI MANISH SULE

Digitally signed by VAISHALI MANISH SULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0e39186eb174ffc2d5d67d71804bf385073457ed3186970cc74a272f3074c496, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CACC4E5906A45E67BCA76EAC2F10992FBF69020ED4EA4E45FA58B2A72EEF683F, cn=VAISHALI MANISH SULE
Date: 2024.08.06 14:47:40 +05'30'

**(वैशाली सुळे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)१/२, महाराष्ट्र, मुंबई,
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई,
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई,
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड,
६. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नांदेड,
७. प्राचार्य, डॉ.शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नांदेड,
८. निवडनस्ती (परिचर्या)